बसवणें हा शब्द संस्कृत अवसेय, अव-सान या शब्दापासून निघालेला स्पष्ट दिसतो.

उदाहरणानि अवसेयानि = उदाहरणें बसवावीं

प्रमाणं अवसेयं=प्रमाण बसवावें

अवसेयं=बसवावें म्हणजे जाणावें

बसवणें म्हणजे जाणणें असा मराठी धातु आहे.

( १०० ) बट्टा

अवष्टंभः = बट्टहा = बट्टा

त्यानें बट्टा दाखविला म्हणजे अवष्टंभ ऊर्फ दर्प ऊर्फ उरमटपणा दाखविला.

( १०१ ) –बा

पाद् = पाअ = वाअ = बा

देवपादाः = देवपाआ=देववाआ =देवबा

गणपादाः = गणबा

गोविंदपादाः = गोंद्बा

हरिपादाः = हरबा

नारायणपादाः = नारबा

महादेवपादाः = म्हाद्बा

बल्लालपादाः = बाळोबा

इ. इ. इ.

( १०२ ) बात्या

वातिकः = बात्या

वातिक म्हणजे धूर्त

गीतनृत्यहसितैः उन्मत्ततां आवहंति वातिकाः ।

बाण –हर्षचरित –चतुर्थोच्छ्वास, पृष्ठ १३८, निर्णयसागर.

बात्या, बाताड्या, बातल, हीं ह्या शब्दाचीं रूपें आहेत.

( १०३ ) बावळ ( ळा–ळी–ळें )

व्याकुल = बाउळ= बावळ (ळा–ळी–ळें)

भयव्याकुलः = भयानें बावळा

( १०४ ) बिजेसिंग

विजितसिंह = बिजेसिंग

( १०५ ) बिळगणें

विलगनं = बिळगणें

( १०६ ) बंड–बंडू

भंड = बंड, बंडू ( ममत्वदर्शक )

बंडोपंत हें नांव मराठींत सामान्य आहे.

( १०७ ) लिमये

ह्या आडनांवाचा निमये असा पाठ कोंकणांत देवाच्या गोठण्यास गोडबोले यांच्या येथें सांपडला. गोत्रांत निमिः, निमयः असें नाम आहे.

निमयः = लिमये

( १०८) लिवलिवणें

लिप्.( लिप्त = भक्षित ) = लिव

( द्विरुक्त ) लिवलिवणें

जीभ फार लिवलिवते आहे, म्हणजे फार खाण्यास इच्छिते आहे.

( १०९ ) व

उत ( आणि ) = उअ = व

ओ, व, हें अव्यय फारशींत संस्कृत-सदृश प्राकृतांतून गेलेलें आहे; व मराठींत महाराष्ट्रीद्वारा उतरलेलें आहे. व हें अव्यय फारसींतून मराठींत आलें, असें म्हणण्याचें कारण नाहीं.

( ११० ) वडा

वटक = वडा ( मत्स्यविशेष )

( १११ ) बरकड

प्राकृत = पराकड = वराकड बरकड

( बाण–हर्षचरित ) प्राकृतप्रमदेव प्रारोदीत्=बरकड स्त्रियांप्रमाणें फार रडली.

प्र = फार

(११२ ) विजेसेन

विजितसेन = विजियसेन = विज सेन, बिजेसेन.

( ११३ ) विडी

विष्टि = विट्ठि = विडी

मुसळ वगैरेंना जें लोखंडाचें वलय किंवा वळें घाळतात त्याला विडी म्हणतात.

( ११४ ) वेड ( डा–डी–डें )

वैधेय ( मूर्ख ) = वेढेअ = वेढ = ( डा–डी–डें ) वेढव्रवा असा शब्द कवितेंत येतो.

( ११५ ) वेडें ( आसक्त )

विधेय=विढेअ=वेड ( डा–डी–डें )

भक्तजनानुरोधविधेयानि तु भवंति देवतानां मनांसि ।

बाण–हर्षचरित–चतुर्थोच्छ्वास
–पृष्ठ १२३–निर्णयसागरप्रत

देवतांचीं मनें भक्तजनांवर वेडीं होतात. तो तिच्यावर वेडा झाला=स तद्विधेयो बभूव ।

( ११६ ) शेळी

छेलिका=शेळी

छगली=शअळी=शेळी

छेलिका हा शेळी ह्या मराठी प्राकृत शब्दावरून बनविलेला संस्कृत शब्द आहे; मूळ शब्द छागः

( ११७ ) शुक्, धुक्

धुक्=शुक्

धुक् जाणें असा संस्कृत धातु आहे. मांजराला शुक् किंवा धुक् म्हणून महाराष्ट्रांत हांकलतात. ज्या वेळेस संस्कृत भाषा बोलण्यांत होती म्हणजे पाणनीच्या वेळेस मांजराला जा, नीघ, असें सांगावयाचें झालें म्हणजे धुक्स्व असें रूप योजीत. त्यावरून मराठींत आज्ञार्थाचें द्वितीयेचें एकवचन धुक् असें परंपरेनें आलें आहे. ह्या मराठीत धुक् रूपावरून पाणिनीय धुक्, ष्वक्, ष्वस्क्, स्वस्क् हे धातु रोजच्या बोलण्यांतले होते, केवळ पाणिनिकल्पित नव्हते, हें उघड होतें इतकेंच नव्हे, तर सिद्ध होतें. मराठी व्युत्पत्तीवरून पाणिनीय धातुपाठावर प्रकाश हा असा पडतो.

( ११८ ) सलग

संलग्न=संलग्ग=सलग

( ११९ ) सरकणें

स्रेकनं=स्रेकणं=सरकणें

स्रेकृ गतिकर्मा

( १२० ) सवरतो

स्वरयति=सवरतो

स्वर म्हणजे दोष काढणें

बोलतो सवरतो म्हणजे बोलतो आणि दोष काढतो.

( १२१ ) सांदणें

संदा ( संदित )=सांदणें ( ग्रंथणें )
सांधणें धातु निराळा.

वि. का. राजवाडे

समाप्त.

# सूची

### इ



### उ

ऋ



ए-ऐ



अं



क

## ख

[ ९

**ट**



**ठ**



**ड**



**ढ**



**त**

र

☞ खालील निबंध यावर्षीं वाचले गेले असून इतिवृत्तांत छापले नाहींत. ते शके १८३६ च्या इतिवृत्तांत उपमंडळानें पसंत केल्यास छापले जातील:—

१ शक १४४६ तील बनावट ताम्रपट २ कांहीं आख्यायिका ३ प्रवृत्ति-निवृत्ति-ऐक्यतारत्नावली ४ सन १८३६ तील पुण्यांतील ठळक गृहस्थांची यादी ५ एक मानभावी बाड ६ श्रीधराबद्दल आणखी कांहीं माहिती ७ आटपाट-नगर ८ रघुनाथपंत हणमंते ९ नारायणांकित माधवदास १० शिवाजीराजे छत्रपति केव्हां झाले ? ११ कांहीं मराठी आडनांवें १२ योगवासिष्ठाचे अवतार १३ दशावतार श्लोक १४ तुकारामाचे टाळकरी १५ संत बहिणाबाई १६ देहूच्या सनदा १७ देवस्की १८ मेदिनीकोशाचा काळ १९ श्रीसंध्या आख्यान २० अवरंगजेबाचा जलुस २१ खडकलाट येथील तीन मराठी ताम्रपट

## मंडळाचे उद्देश व नियम

( १ ) संशोधनाचें काम वर्षानुवर्ष सारखें व्हावें म्हणून तीन चार संशोधकांची या च कामीं नेमणूक करून त्यांचा योगक्षेम चालविणें.

( २ ) आपल्या महाराष्ट्रांत च अजून कित्येक ऐतिहासिक घराणीं अशीं आहेत कीं त्यांच्याकडील कागदपत्रांचा आपल्यास कांहींच शोध नाहीं. तो शोध लावून ते कागदपत्र मिळविणें.

( ३ ) मराठी भाषेच्या उत्पत्तीपासून तों शके १७४० पर्यंत मराठींत जें अनेकविध सारस्वत निर्माण झालें त्यापैकीं सहस्रांशाची फार तर आपल्यास माहिती झाली आहे. बाकीचें जें सारस्वत अज्ञातवासांत पडलें आहे तें प्रकाशांत आणणें.

( ४ ) एतद्विषयक सर्व संदर्भग्रंथांचा संग्रह करणें.

( ५ ) इतिहासाच्या साधनांचे खंड व काव्यग्रंथ प्रकाशित करणें.

( ६ ) व्यक्तिशः सभासदांकडे जो संग्रह झाला आहे व यापुढें मंडळाचा प्रयत्नानें जो होणार आहे तो अग्नीपासून सुरक्षित ठेवण्यासाठी सरस्वतीमंदिर बांधणें.

( ७ ) संशोधनात्मक निबंध व रचणें त्रैमासिक, षाण्मासिक अगर वार्षिक वृत्तरूपानें प्रकाशित करणें.

हीं व या च धोरणाचीं इतर कामें विस्तृत प्रमाणावर व्हावींत असा मंडळाचा हेतु आहे.

मंडळाचे सभासद होण्याविषयीं नियम पुढीलप्रमाणें आहेत.

( अ ) मंडळास दरसाल ३०० किंवा अधिक रुपये देणारे " आश्रयदाते " होत.

( आ ) दरसाल १२५ अथवा अधिक रुपये देणारे " हितकर्ते " होत.

( इ ) दरसाल २५ अगर अधिक रुपये देणारे " सभासद " होत.

( वरील तिन्ही वर्गांच्या हातीं मंडळाची व्यवस्था राहील. )

( ई ) दरसाल किमान १२ रुपये देणारे " साधारण सभासद " होत.

( उ ) दरसाल किमान ६ रुपये देणारे " सहानुभविक सभासद " होत.

( ऊ ) दरसाल किमान ३ रुपये देणारे " चहाते " होत.

पहिल्या चार वर्गांच्या सभासदांना मंडळाकडून प्रकाशित होणाऱ्या ग्रन्थांची निराळी किंमत पडणार नाहीं. सहानुभविक सभासदांस ते ग्रंथ निम्म्या किंमतीस मिळतील.

☞ **मंडळाचें वर्ष चैत्र ते फाल्गुन.**